पोलीस आयुक्त, पुणे शहर यांचे आस्थापनेवरील "दत्तवाडी पोलीस ठाणे" चे नांव बदलून "पर्वती पोलीस ठाणे" करण्यास मान्यता देणेबाबत.....

# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

## शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-०२२२/प्र.क्र.०५/पोल-३

मंत्रालय, दुसरा मजला, मुख्य इमारत,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई
दिनांक : १५ जून, २०२३.

संदर्भ :-

१. शासन निर्णय, गृह विभाग, क्र.पीओएस-०८०७/८७२/प्र.क्र.१६३/पोल-३, दि.१५/१२/२००७.
२. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य,मुंबई यांचे पत्र क्र.पोमसं/२६-अ/४७/दत्तवाडी पो.स्टे. नाव/१५८/२०२१,दि.२२/१२/२०२१ व दि.२३/३/२०२३ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

पोलीस आयुक्त,पुणे शहर, यांचे आस्थापनेवरील स्वारगेट पोलीस ठाणेचे विभाजन करून दत्तवाडी पोलीस ठाणे निर्माण करण्यास उक्त संदर्भीय क्र.१ येथील दि.१५/१२/२००७ शासन निर्णयाव्दारे मान्यता देण्यात आली आहे.

२. तथापि,पोलीस आयुक्त,पुणे शहर यांचे कार्यक्षेत्राअंर्तगत अस्तित्वात असलेल्या दत्तवाडी पोलीस चौकी व दत्तवाडी पोलीस ठाणे यांच्या नामसांधर्म्यामुळे तेथील नागरिकांमध्ये संभ्रम निर्माण होत असल्याबाबत प्राप्त निवेदनाच्या अनुषंगाने पोलीस महासंचालक कार्यालयाने उक्त संदर्भीय क्र.२ येथील दि.२२/१२/२०२१ व दि.२३/३/२०२३ च्या पत्राव्दारे दत्तवाडी पोलीस ठाणेचे नांव बदलून पर्वती पोलीस ठाणे करण्याची विनंती शासनास केली आहे.

३. उक्त विनंतीच्या अनुषंगाने व या परिसरात असलेल्या पर्वती टेकडीचे ऐतिहासिक व सांस्कृतिक महत्व विचारात घेवून,उक्त विनंतीच्या अनुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे

**शासन निर्णय:-**

पोलीस आयुक्त,पुणे शहर यांचे आस्थापनेवरील “दत्तवाडी पोलीस ठाणे”चे नांव बदलून “**पर्वती पोलीस ठाणे**” असे नामकरण करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०६१५१६५०४९६६२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RUPALI SANJOG KABARE

Digitally signed by RUPALI SANJOG KABARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=825ec39543f0d33deccec30f6ca54b1adc430443efec55f07e98dc173423779d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5CB43A03D973FF96AABBF02A74864A4681399FE663D8FBDE0441A596BEB3ACDD, cn=RUPALI SANJOG KABARE
Date: 2023.06.15 16:53:36 +05'30'

**( रुपाली कबरे )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,मंत्रालय,मुंबई.

२. मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव,मंत्रालय,मुंबई.
३. पोलीस महासंचालक,महाराष्ट्र राज्य,मुंबई.
४. जिल्हाधिकारी, पुणे.
५. पोलीस आयुक्त,पुणे शहर.
६. अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई.
७. जिल्हा कोषागार अधिकारी,पुणे.
८. सह सचिव (पोल ३),गृह विभाग,मंत्रालय,मुंबई
९. निवासी लेखा परीक्षा अधिकारी,वांद्रे,मुंबई.
१०.निवड नस्ती, पोल-३.